सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांच्या बदल्या/ प्रतिनियुक्ती बाबत...

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन निर्णय क्र.नियुक्ती-१११८/९४०/प्र.क्र.७७/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
दिनांक :- २५ जून , २०१८.

**प्रस्तावना :-**

नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालयाच्या आस्थापेनवरील सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्याच्या सन २०१७ मधील बदल्याचे आदेश शासन निर्णय क्र.संकीर्ण-५८१७/७३५/प्र.क्र.९५/नवि-२७ दिनांक २२/१२/२०१७ अन्वये निर्गमित करण्यात आले आहेत. सदर बदली आदेशानुसार रिक्त झालेली सहाय्यक संचालक नगर रचना संवर्गातील काही पदे बदलीने भरण्याची बाब शासनाच्या विचारीधीन होती. उक्त दिनांक २२-१२-२०१७ च्या आदेशात अंशता बदल करून उक्त पदावर सहाय्यक संचालक नगर रचना यांच्या बदलीबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन निर्णय :-**

महाराष्ट्र/ शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५ मधील कलम ४ (४) (दोन) व कलम ४ (५) मधील तरतुदींनुसार व प्रशासकीय कारणास्तव खालील विवरणपत्रात दर्शविण्यात आल्यानुसार सहाय्यक संचालक, नगर रचना (गट-अ / राजपत्रित) संवर्गातील अधिकाऱ्यांची बदली करून पदस्थापना करण्यात येत आहेत.

| अ.क्र. | अधिकाऱ्याचे नाव | सध्या कार्यरत असलेले कार्यालय | बदली नंतरचे कार्यालय |
|---|---|---|---|
| १ | श्री.सु.पु.कांबळे | सहाय्यक संचालक, नगर रचना, अमरावती महानगरपालिका (शा.अ) | सहाय्यक संचालक, नगर रचना, वाशीम (श्री.द.नि. पवार यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या पदावर ) |
| ३ | श्री. वि. ल. वाघमोडे | सहाय्यक संचालक, नगर रचना, अमरावती | सहाय्यक संचालक, नगर रचना, सातारा (रिक्त पदी) |

०२. श्री. द.नि.पवार हे सहाय्यक संचालक, नगर रचना, वाशिम यांची शासन निर्णय क्र. बदली-५८१७/७३५/प्र.क्र.९५ /न.वि.-२७ दि.२२/१२/२०१७ रोजी अन्वये झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र, पुणे येथे बदली करण्यात आली आहे तथापि त्याआदेशांची अंलबजावणी वाशीम येथे अधिकारी उपलब्ध झाल्यावर करावयाची असल्याची अट नमूद करण्यात आली होती. आता प्रस्तुत आदेशान्वये श्री. सु.पु.कांबळे यांची सहाय्यक संचालक, नगर रचना, वाशिम या (श्री. पवार यांच्या बदलीने रिक्त होणाऱ्या) पदावर बदली करण्यात येत असल्याने श्री द.नि. पवार सहाय्यक संचालक, नगर रचना दिनांक २२-१२-२०१७ च्या बदली आदेशाची अंमलबजावणी करण्यात यावी.

०३. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी वरील अधिकाऱ्यांना बदलीने पदस्थापना दिलेल्या ठिकाणी रुजू होण्याकरिता आवश्यक ते कार्यकारी आदेश तातडीने निर्गमित करण्याची कार्यवाही करावी. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे बदलीबाबतचे कार्यकारी आदेश प्राप्त होताच संबंधित अधिकाऱ्यांनी बदलीच्या ठिकाणी तातडीने रुजू व्हावे.

०४. उपरोक्त अधिकाऱ्यांची सार्वजनिक सेवेच्या हितार्थ व प्रशासकीय सोयीच्या दृष्टीने बदली करण्यात येत असल्याने त्या अधिकाऱ्यांना नियमानुसार अनुज्ञेय पदग्रहण अवधी व संयुक्त बदली अनुदान मंजूर करण्यात यावे.

०५. सदरहू आदेशान्वये बदली करण्यात आलेल्या अधिकाऱ्यांनी नियुक्तीच्या ठिकाणी हजर न झाल्यास वा राजकीय दबाव आणून बदली रद्द करण्याचा प्रयत्न केल्यास त्याची संबंधित अधिकाऱ्यांच्या गोपनीय अहवालात नोंद घेण्यात येईल. तसेच राजकीय दबावाबाबतची कृती महाराष्ट्र नागरी सेवा (वर्तणूक) नियम, १९७९ मधील नियम ३ (३) व २३ चे उल्लंघन करणारी असल्यामुळे ती गैरवर्तणूक समजून संबंधितांविरुध्द शिस्तभंगविषयक कारवाई करण्यात येईल, याची नोंद घेण्यात यावी.

०६. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी, सदर बदल्यांच्या अनुषंगाने रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार त्याच अथवा नजिकच्या कार्यालयातील समकक्ष दर्जाच्या अधिकाऱ्यांकडे अथवा बदली होणाऱ्या अधिकाऱ्याच्या संवर्गास कनिष्ठ असलेल्या संवर्गामधील त्याच कार्यालयातील ज्येष्ठ अधिकाऱ्याकडे सोपविण्यात यावा. परंतु, कोणत्याही परिस्थितीत बदली होणाऱ्या अधिकाऱ्याकडे त्याच्या बदलीमुळे रिक्त होणाऱ्या पदाचा अतिरिक्त कार्यभार सोपविला जाणार नाही, याची दक्षता घ्यावी.

०७. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा सांकेताक **२०१८०६२५१४३९५६१८२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vishnu Shripati Patil

Digitally signed by Vishnu Shripati Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21ebe4508a75a767041512feeaa6b8f2d5bc8caf857fe02cd29ce4bbb772da09, serialNumber=f8a0fc598f692587efafe9bd62df9e449fdf81c803c27adf1782c97c76ebcba5, cn=Vishnu Shripati Patil
Date: 2018.06.26 16:16:51 +05'30'

**( विष्णू पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रति,**

सर्व संबंधित अधिकारी -------------------------------------, यांना,
(संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत.)

**प्रत :-**

१. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-१, महाराष्ट्र, मुंबई.
२. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता)-२, महाराष्ट्र, नागपूर.
३. महालेखापाल (लेखा परिक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई.
४. महालेखापाल (लेखा परिक्षा)-२, महाराष्ट्र, नागपूर.
५. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.

६. अपर मुख्य सचिव गृहनिर्माण विभाग मंत्रालय मुंबई

७. मा. प्रधान सचिव, नगर विकास विभाग (न.वि.-२) मंत्रालय मुंबई

८. आयुक्त, अमरावती महानगरपालिका, अमरावती .

९. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(३-प्रती)**

१०. जिल्हाधिकारी, अमरावती/वाशीम/सातारा

११. मुख्य कार्यकारी अधिकारी, झोपडपट्टी पुनर्वसन प्राधिकरण, पुणे व पिंपरी चिंचवड क्षेत्र पुणे

१२. सर्व सह संचालक, नगर रचना------------------------.

१३. उप सचिव (नवि-२६), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१४. उप सचिव (नवि-३/२७), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई

१५. न.वि-२७ नगर विकास विभाग ( निवड नस्ती)

१६. नस्ती क्र. बदली-५८१७/७३५/प्र.क्र.९५ /न.वि.-२७ वर ठेवण्यासाठी